रुपये 5 कोटी पेक्षा जास्त रकमेच्या
प्रकल्पासाठी तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध
करुन घेण्याकरिता कार्यपध्दती संबंधी

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र.मातंस/फाईल-08/70/39

सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

दि.24 मे,2011.

वाचा: शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.मातंस/फाईल-08/70,दि.27 जुलै, 2009.

**प्रस्तावना -**

राज्यशासनाच्या मंत्रालयीन विभाग, सार्वजनिक उपक्रम, स्वायत्त संस्था यांना ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविणे तो विकसीत करणे त्यातील यंत्रणेची देखभाल करणे इत्यादी सारख्या बाबीमध्ये सहाय्य करण्यासाठी तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याकरीता महाराष्ट्र सेतु संस्थेने मे. नेलीटो सिस्टीम लि. आणि मे. मास्टेक लि. यांची निवड (Empanelment) केलेली आहे.

**शासन निर्णय :-**

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की,तांत्रिक मनुष्य बळ उपलब्ध करुन देण्यासाठी मे.नेलीटो लि. आणि मे. मास्टेक लि.ची निवड करण्यात आलेली आहे. मंत्रालयीन विभाग / सार्वजनिक उपक्रम/ स्वायत्त संस्थांकडून ई-गव्हर्नन्स संबंधी राबविण्यात येणा-या कोणत्याही प्रकल्पावर येणारा खर्च रुपये 5 कोटी पेक्षा जास्त असेल तर संस्थांची निवड करतांना ई-टेंडरिंग प्रणालीचा अवलंब करावा, तसेच संगणकीकरण, सॉफ्टवेअरचा विकास करणे, इत्यादी बाबी करिता महाराष्ट्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार प्रकल्प राबविण्याकरीता गठीत केलेली प्रकल्प अंमलबजावणी समिती (PIC) व उच्चाधिकार समिती (HPC) यांची मान्यता घेणे आवश्यक राहिल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध आहे. त्याचा संकेतांक 20110524123139001 असा आहे. मंत्रालयीन विभागांनी हा शासन निर्णय त्यांच्या अधिनस्त कार्यालये/महामंडळे/स्वायत्त संस्था यांच्या निदर्शनास आणावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(डॉ.संतोष भोगले )
अवर सचिव, (मा.तं),महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव,

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.

निवड नस्ती.